यवतमाळ येथील नाटयगृहाच्या कामासाठी
निधी वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : नागृबा-२०००/प्र.क्र.६४ (भाग-१)/सां.का.१**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ३० मार्च, २०२३

वाचा १) शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य, व क्रीडा विभाग क्रमांक, यनाबा-१०९९/प्र.क्र.१६/सां.का.१, दि.१६.०३.१९९९
२) शासन निर्णय, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, व क्रीडा विभाग क्रमांक नागृबा-२०००/प्र.क्र.६४/सां.का.१, दि.३०.०३.२००१
३) शासन निर्णय, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, व क्रीडा विभाग, क्रमांक नागृबा-२०००/४०६/प्र.क्र.६४/सां.का.१, दि.१२ फेब्रुवारी, २००२
४) जिल्हाधिकारी, यवतमाळ यांचे पत्र क्र.नपप्र/कार्या-६/कावी-११३३/२०२३, दि.२१.०३.२०२३.
५) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्रमांक नागृबा-२०००/ प्र.क्र.६४ (भाग-१)/सां.का.१, दि. २३.३.२०२३
६) शासन ज्ञापन, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्र.संकीर्ण-२०२३/ प्र.क्र.४२/सां.का.१, दि.३०.०३.२०२३

**प्रस्तावना :**

यवतमाळ जिल्हयात बंदिस्त नाट्यगृह बांधण्याच्या अंदाजपत्रकास शासनाच्या दि.१६ मार्च, १९९९ च्या शासन निर्णयान्वये रु.२,२६,५२,१००/- इतक्या रकमेस प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. तद्नंतर दि.६.१.२००१ च्या शासन निर्णयानुसार शासन हिश्श्याचे स्वरुप बदलल्याने (७५% शासन हिस्सा व २५% महानगरपालिका ) संदर्भ क्र.३ च्या शासन निर्णयान्वये रु.२,९६,१५,९१५/- इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास नव्याने प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. यवतमाळ येथील नाटयगृहाच्या बांधकामासाठी एकूण रु.२,२५,००,०००/-इतका शासन हिश्शाचा निधी वितरीत करण्यात आला आहे. यवतमाळ येथील नाट्यगृहाची पुढील उर्वरित काम करण्यासाठी रु.३,२३,५१,०००/- इतक्या रकमेच्या खर्चास संदर्भ क्र. ५ च्या शासन निर्णयाअन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.

| | |
|---|---|
| १. | नाट्यगृह संकुलामध्ये बैठक व्यवस्थेकरिता खुर्च्या व आवश्यक फर्निचर बसविणे |
| २. | नाट्यगृह संकुलामध्ये सेप्टीक टँक व प्लंबींग कामे करणे |
| ३. | नाट्यगृह संकुलामध्ये चौकीदार केबिन व बाहेरील गेटच स्थापत्य विषयक कामे करणे |
| ४. | नाट्यगृह संकुलामध्ये लँडस्केपींगचे कामे करणे |
| ५. | नाट्यगृह संकुलामध्ये म्युरल पेंटीगचे कामे करणे |

सदर कामासाठी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

यवतमाळ येथील नाट्यगृहाची उपरोक्त कामे करण्यासाठी शासन हिश्याच्या ९० टक्के म्हणजेच रु.२,९१,१५,९००/- (रुपये तीन कोटी तेवीस लक्ष एकावन्न हजार फक्त) इतक्या खर्चास मान्यता देऊन, सदर रक्कम जिल्हाधिकारी, यवतमाळ यांना वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२.      सदर प्रकरणी जिल्हाधिकारी, यवतमाळ हे नियंत्रक अधिकारी राहतील व त्यांनी प्राधिकृत केलेल्या दुय्यम अधिकाऱ्यास या संबंधीच्या देयकावर स्वाक्षरी करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे.

३.      संदर्भ क्र. ३ मध्ये नमुद शासन निर्णयातील अटी व शर्तीचे पालन करावे.

४.      सदर कामाचा भौतिक व आर्थिक साध्य बाबतचा त्रैमासिक अहवाल शासनास सादर करावा.

५.    वितरीत करण्यात आलेल्या अर्थसहाय्याची रक्कम खर्च केल्याचे सनदी लेखापालांनी प्रमाणित केलेले विहीत नमुन्यातील उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करणे बंधनकारक राहील.

६.      यासाठी होणारा खर्च मागणी क्र.झेडडी-२, २२०५ कला संस्कृती (००) १०२-कला व संस्कृती प्रचालन (०१)(०२) शासकीय प्रेक्षागृहे व सभागृहे (२२०५ १४८१) ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशीर्षाखाली सन २०२२-२३ च्या अर्थसंकल्पीय वर्षात संदर्भ क्र.६ च्या शासन ज्ञापनाअन्वये पुनर्विनियोजनाव्दारे प्राप्त झालेल्या अनुदानातून भागविण्यात येईल.

७.      हा शासन निर्णय, नियोजन विभागाच्या सहमतीने आणि वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १६२/२०२३/व्यय १५, दि.३०.०३.२०२३ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८.      सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध झाला असून, त्याचा सांकेतांक क्रमांक २०२३०३३०१६४८४०७७२३ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIDYA HEMANT WAGHMARE

Digitally signed by VIDYA HEMANT WAGHMARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=4e214bf8a250420c28c2084d8dd965c0d454568322bd41981d48971712e51795, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F93EFE7B946BF26FF989D6E5E01E1B122B9EB4E3E4E6799CB8E82B2D33D58DFC, cn=VIDYA HEMANT WAGHMARE
Date: 2023.03.31 10:47:00 +05'30'

**( विद्या वाघमारे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. विरोधी पक्ष नेता, विधान सभा, विधान परिषद, विधानमंडळ, मुंबई.
४) सर्व सन्माननीय विधानमंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य.
५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)२-, महाराष्ट्र, नागपूर
६) महालेखापाल (लेखा परीक्षा)२-, महाराष्ट्र, नागपूर
७) जिल्हाधिकारी, जिल्हा यवतमाळ
८) मुख्याधिकारी, यवतमाळ नगर परिषद, यवतमाळ
९) जिल्हा कोषागार अधिकारी, यवतमाळ
१०) नियोजन विभाग / सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
११) वित्त विभाग (व्यय-१५ अर्थसंकल्प/) मंत्रालय, मुंबई.
१२) मा.मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई
१३) अवर सचिव (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१४) निवड नस्ती (सां.का.१)